# जेन गुडॉल

## चिंपांझी संशोधक

लेखिका: कॅथरिन क्रोहन    चित्रे: सिंथिया मार्टीन,
ॲन टिमॉन्स



# जेन गुडॉल

## चिंपांझी संशोधक

मराठी अनुवादः सुशील मेन्सन

## अनुक्रम

# प्रकरण 1

## एक जिज्ञासू मुलगी

1936 मध्ये, *जेन गुडॉलच्या* वडिलांनी तिला खेळण्यातील चिंपांझी दिले. ते गुबगुबीत खेळणे अगदी लंडन प्राणीसंग्रहालयानजिक जन्मलेल्या पहिल्या *ज्युबिली* चिंपांझीसारखे दिसत होते.

तुला खेळणं आवडलं ते बघून मला आनंद झाला, जेन. तू त्याला अगदी झूमधल्या चिंपांझीसारखं *ज्युबिली* म्हणू शकतेस.

बालपणापासूनच गुडॉलला प्राण्यांची आवड होती. ती चार वर्षांची असताना, तिला अंडी कुठून येतात, याचे कुतूहल वाटू लागले.

कोंबडीमध्ये एवढं मोठं भोक कुठे असतं, ज्यातून एक अंड बाहेन निघेल?

मी हलू शकत नाही, नाहीतर कोंबडी घाबरेल.

कित्येक तास वाट पाहिल्यावर, गुडॉलच्या संयमाला फळ आले. शेवटी, ते गूढ उकलले.

अस्सं! आता मला समजलं.

PLOP

कोंबडीच्या खुराड्यात पाहिलेली गोष्ट आईबाबांना सांगायला गुडॉल आतुर झाली.

जेन! तू आम्हाला खूप काळजीत टाकलंस. कुठे होतीस तू?

अंडी कुठून येतात, हे बघत होते मी – आणि आता मला ते कळलंय.

छान आहे, बरं! पण पुढच्या वेळी आम्हाला सांगून जात जा, तुझं प्राणी संशोधन कुठे करणार आहेस ते.

गुडॉलला आफ्रिकी प्राण्यांचा अभ्यास करण्यात रस होता. विशेषत: तिला *डॉ. डूलिटल* आणि *टारझन*विषयी पुस्तके वाचायला आवडत.





पशुपक्ष्यांच्या बारीकसारीक गोष्टींचं निरीक्षण कर, म्हणजे ते कसं चालतात, डोकं हलवतात, पंख फडफडवतात, शेपूट हलवतात.

मला डॉ. डूलिटलसारखं प्राण्यांवर काम करायचंय. ते प्राण्यांचं निरीक्षण करून त्यांची माहिती गोळा करतात.

ती 10 वर्षांची असताना, गुडॉलने शपथ घेतली की एक ना एक दिवस ती आफ्रिकेला जाणार.





माझे मित्र सांगतात की आफ्रिका भयंकर जागा आहे. ते म्हणतात, मी तिथे एकटी जाऊ शकत नाही.

नको ऐकूस त्यांचं, जेन. तू मोठी झालीस की तू तुला हवं ते करू शकशील.



1952 मध्ये, वयाच्या 18 व्या वर्षी, गुडॉल हायस्कूल उत्तीर्ण झाली.





जेन, आपल्याला फक्त तुझ्या टायपिंग, शॉर्टहँड कोर्सचाच खर्च परवडू शकतो.

पण मग माझ्या आफ्रिकेला जायच्या स्वप्नाचं काय?

कोर्स केल्यावर तू कुठल्याही ऑफिसात सेक्रेटरी बनू शकशील.

1953 मध्ये, गुडॉलने इंग्लंडमधील *दक्षिण केन्सिंग्टन* जिल्ह्याच्या *क्वीन्स सेक्रेटरीयल* शाळेत प्रवेश घेतला. तिथे शिकल्यानंतर तिला लंडनमध्ये टायपिस्टची नोकरी मिळाली.

एके दिवशी, गुडॉलला तिचा मित्र *क्लो मांगे*चे पत्र आले. मांगेचे कुटुंब आफ्रिकेतील केनिया देशात स्थलांतरीत झाले होते.



प्रिय जेन,
केनियाला जरूर ये. तुला केनिया नक्की आवडेल.
सप्रेम, क्लो.

मी गेली अनेक वर्ष आफ्रिकेत जायची, तिथले प्राणी बघायची स्वप्नं रंगवतेय. पण मला तिथे जायचा खर्च परवडेल?



प्रवासासाठी पैसे साठवू, असे ठरवून गुडॉल आपल्या घरी परतली. तिथे ती रेस्टॉरंटमध्ये वेटर म्हणून काम करू लागली.

1957 मध्ये, 21 दिवसांच्या प्रवासानंतर, *केनिया कॅसल* या जहाजातून, गुडॉल केनियातील *मोंबासा* शहरात पोहोचली.

शेवटी मी आफ्रिकेत आलेच. माझा विश्वासच बसत नाहीये.

मग, गुडॉल दोन दिवसांचा रेल्वे प्रवास करून *नैरोबी,* या केनियाच्या राजधानीत पोहोचली. प्रवासादरम्यान तिने आफ्रिकेतील गावे तसेच अनेक जंगली प्राणी पाहिले.

हत्ती जवळून किती मोठे दिसतात!

NAIROBI TIMES

क्लो मांगे गुडॉलला न्यायला नैरोबी रेल्वे स्टेशनवर आला. ते गाडीने मांगेच्या घरी गेले.

आपल्यापेक्षा किती उंच आहे हा जिराफ! मला जंगली प्राण्यांवर काम करायला खरोखरंच खूप आवडेल.

## प्रकरण 2

# लिकीसोबत काम

केनियात पोहोचल्यावर थोड्याच काळात एका मित्राने गुडॉलला *डॉ. लुई लिकी*बद्दल सांगितले. लिकी हे प्रसिद्ध संशोधक होते. ते आफ्रिकेत राहात आणि काम करत. लिकी हे प्राणी आणि जीवाश्मांचा अभ्यास करत. ते वानर आणि मानव यांच्यातील साम्य शोधण्याबाबत काम करत.

मे 1957 मध्ये, गुडॉल लिकीला भेटली आणि तिला आफ्रिकी प्राण्यांवर काम करण्यात रस असल्याचे त्यांना सांगितले.

तू म्हणालीस की तुझ्याकडे कॉलेजची पदवी नाही. पण तुला प्राण्यांची बऱ्यापैकी माहिती दिसतेय.

लहानपणापासूनच मी आफ्रिकी प्राण्यांबद्दल वाचत आलीय. मला नेहमी आफ्रिकेला यावंसं वाटायचं.

माझी सेक्रेटरी नुकतीच नोकरी सोडून गेलीय. तू काम करशील का तिच्या जागी?

हा माझ्यासाठी सन्मानच आहे.



पुढल्या काही महिन्यांत, लिकीने गुडॉलचे काम पाहिले. ती मेहनती होती आणि तिला प्राण्यांची खूप काळजी होती. लिकीला जाणवले की गुडॉल एक उत्कृष्ट संशोधक बनू शकेल.

जेन, आपल्याला जंगली चिपांझींबद्दल फार काही माहिती नाही.

त्यांच्यानजिक गेलो तर जास्त माहिती मिळेल आपल्याला.

जंगली चिंपांझींचा अभ्यास करून आपल्याला सुरुवातीच्या मानवप्राण्यांबद्दल ज्ञान मिळू शकेल.

माझी जंगली चिपांझींचा अभ्यास करायची इच्छा आहे. तुला आवडेल हे काम करायला?

तुम्हाला खात्री आहे, मी हे काम करू शकते याची?

मला अशी व्यक्ती हवीय जिच्याकडे संयम आहे, जिला वानरांमध्ये राहायला आवडेल आणि जिला फक्त पदवी मिळवण्यात रस नाही. या अटी तू पूर्ण करतेस, जेन.

लक्षात ठेव, हे काम कठीण आहे आणि दीर्घकाळ चालेल.

माझं स्वप्न प्रत्यक्षात उतरतंय.

जून 1960 मध्ये, 26 वर्षीय गुडॉलने पूर्व आफ्रिकेच्या *गॉम्बे* येथील जंगलात चिंपाझींचा अभ्यास सुरू केला. पहिले काही आठवडे गुडॉलची आई तिच्यासोबत तिथे राहिली.

एका आफ्रिकी गाईडसोबत त्यांनी *टांग्यानिका* सरोवरानजिक असलेल्या घनदाट *कासाकेला* पर्वतीय जंगलाचा दौरा केला.

एकदाची मी इथे आले, याचा खूप आनंद होतोय मला. मी थोडा फेरफटका मारून येते.

नंतर, गुडॉल आणि तिचा गाईड यांनी चिंपांझीच्या शोधात जंगलाची सैर केली.

बघा – इथे चिंपांझी खाऊन गेलेयत नुकतंच. हे झाड पिकलेल्या फळांनी लगडलेलं आहे.

म्हणजे, ते नक्कीच परततील. चल, जवळच लपू कुठेतरी आणि वाट बघू.



तासाभरानंतर, गुडॉल आणि गाईड यांनी चिंपांझींची त्यांच्या विशिष्ट भाषेतील हाक ऐकली.

आले बघा ते. चिंपांझी आणखी फळं शोधतायत.

दोन तासांनंतर, समाधानाने तृप्त झालेले चिंपांझी झाडावरून खाली उतरले आणि पळून गेले.

10 दिवस चिंपांझी त्या झाडाजवळ रोज येत. ते फळे खात असताना गुडॉलने त्यांचे रोज निरीक्षण केले.


अभ्यासदौऱ्याचे पहिले काही महिने कठीण गेले.


पळू नका. मी काही इजा करणार नाही तुम्हाला.




गुडॉलने एका कड्यावरील खडकावर बसून चिंपांझींचे निरीक्षण केले. तिने त्यांच्या हालचाली आणि वागणं यांची काळजीपूर्वक नोंद केली. प्रत्येक चिंपांझीचे तिने नामकरण केले.
इतके महिने त्यांचं निरीक्षण केलं तरी *फ्लो* आणि तिचं कुटुंब मला त्यांच्याजवळ येऊच देत नाहीयेत. ते कायम मला घाबरतच राहाणार का?




रात्री, गुडॉल आपल्या नोंदी एका जर्नलमध्ये उतरवत असे. तिने जंगलात पाहिलेली प्रत्येक गोष्ट तपशीलवार नोंदवली. या नोंदी तिने लिकींनाही पाठवल्या. लिकीची इच्छा होती की गुडॉलची निरीक्षणं ही चिंपांझींची बुद्धिमत्ता सिद्ध करणारे जगातील पहिले संशोधन ठरावे.
चिंपांझींची कुटुंबं समूह करून एकत्रच फिरतात, असं आढळलं. त्यांची बाळं आपल्या आईला कधीच सोडत नाहीत.




एका वर्षाच्या अभ्यासानंतर, गुडॉल इंग्लंडला परतली. लिकीने गुडॉलसाठी इंग्लंडच्या केंब्रिज विद्यापीठात शिकण्याची व्यवस्था केली होती.
जेन, इतर संशोधक तुझ्या संशोधनावर शंका घेतील, कारण तुझ्याकडे पदवी नाही.
संशोधकांनी फक्त माझ्या कामाला महत्त्व द्यावं. माझी निरीक्षणं लोकांचे प्राण्यांबाबत असलेले दृष्टिकोन बदलू शकतील.
केंब्रिजमध्ये तुला विज्ञानाबद्दल जास्त शिकायला मिळेल. त्यामुळे तू एक चांगली संशोधक बनशील.

# प्रकरण 3

## विलक्षण शोध

कॉलेजमध्ये एक वर्ष शिकल्यावर, गुडॉल गॉम्बेमध्ये परतली. एकदा संध्याकाळी, ती कॅम्पकडे परतत असताना, तिच्या स्वयंपाक्याने एक रोमांचक बातमी आणली.

जेन! एक चिंपांझी आपल्या कॅम्पवर आला होता आज. त्या झाडावर चढून त्याने भरपूर फळं खाल्ली.

खूप चांगली बातमी आहे.

आणखी एक, त्या चिंपांझीने तुमच्या रात्रीच्या जेवणासाठी ठेवलेली केळी चोरली.

हे तर आणखी चांगलं झालं. आता तो पुन्हा पुन्हा येईल इथे.

पुढल्या दिवशी दुपारी, तो चिंपांझी परत आला. गुडॉलने त्याला ओळखले. तिने कड्यावरील खडकावर बसून निरीक्षण केलेल्या चिंपांझींपैकीच एक होता तो.

तो *डेव्हीड ग्रेबिअर्ड* आहे! आणखी खजूर खाण्यासाठी आलाय तो.



पुढल्या काही आठवड्यांत, डेव्हीड ग्रेबिअर्डला गुडॉलबद्दल विश्वास वाटू लागला.

शेवटी, या विलक्षण प्राण्याच्या जवळ जाऊ शकलेच मी.

गुडॉल जंगलात नेहमी डेव्हीड ग्रेबिअर्डच्या मागेमागे चालू लागली.

मी केळं कुठे लपवलंय? शोध बघू.

डेव्हीड ग्रेबिअर्डला आता माझी भीती वाटत नाही. आशा आहे की इतर चिंपांझींनासुद्धा कळलं असेल की मी त्यांना इजा करणार नाही.

लवकरच, गुडॉल इतर चिंपांझींच्या नजिक जाऊ लागली. एका मादी चिंपांझीने आपल्या बाळाला गुडॉलकडे जाऊ दिलं, तेव्हा गुडॉल शहारली.

विश्वास बसत नाही. हा क्षण मी कधीच विसरू शकत नाही.

तो एका फांदीची साल सोलतोय. चिंपांझी अवजारं बनवू शकतात!

गुडॉल चिंपांझींना जवळून बघू शकत होती. त्यामुळे तिने त्यांच्या दैनंदिन व्यवहारांबद्दल अनेक नवे शोध लावले.

गुडॉलने पाहिले की डेव्हीड ग्रेबिअर्डने न्याहारीला खायला वाळवी पकडण्यासाठी त्यांच्या वारुळात एक काठी खुपसली.

आश्चर्य आहे! चिंपांझी अवजारं वापरतात. कोणत्याही संशोधकाने हे बघितलं नाहीये. अद्याप.



प्रत्येक चिंपांझीला स्वतःचे व्यक्तिमत्व होते. आणि मानवासारखंच, त्यांनाही आनंद, मत्सर, दुःख, प्रेम अशा भावना होत्या.

चिंपांझींना राग येऊ शकतो. मग ते एकमेकांशी हिंसकपणे वागतात.

WHOO-HO WHOO-HO-AH AH-AH-AHH

WRRAAAAW!

लिकी आणि गुडॉलने गॉम्बेतील अभ्यासाबद्दल लेख लिहिले, भाषणे दिली. नॅशनल जिऑग्राफीक सोसायटीने गुडॉलच्या संशोधनाला पाठींबा दिला. सोसायटीने त्यांच्या मासिकासाठी फोटोग्राफर *ह्यूगो वॅन लॉविक* याला गुडॉल आणि चिंपांझींचे फोटो काढायला पाठवले.







शेवटी, गुडॉल आणि वॅन लॉविक एकमेकांच्या प्रेमात पडले. 1964 साली त्यांनी लग्न केले.



1965 मध्ये, गुडॉलने *इथॉलॉजी* (प्राण्यांचे वर्तन) विषयात पदवी मिळवली. पण काही संशोधकांना तिच्या निष्कर्षांबद्दल शंका वाटत होती.

गॉम्बेतल्या चिंपांझींचा अभ्यास करणारी ही बाई म्हणते की चिंपांझी राग, दु:ख आणि प्रेम या भावना दाखवतात. माझा तर विश्वासच बसत नाही. फक्त मानवच अशा भावना बाळगतो.




पदवीधर झाल्यावर, गुडॉल आफ्रिकेत परतली. तिथे तिने *गॉम्बे संशोधन केंद्र* स्थापन केले. जगभरातील निवडक कॉलेज विद्यार्थ्यांचे गट तिथे चिंपांझींच्या अभ्यासात मदत करण्यास येऊ लागले.






1967 मध्ये, गुडॉल आणि वॅन लॉविक यांना एक मुलगा झाला. पुढल्या काही वर्षांत, गुडॉल एक आई, शिक्षक आणि संशोधक म्हणून खूप व्यग्र झाली. तिने गॉम्बे केंद्रात 12 विद्यार्थ्यांच्या शोधकामावर देखरेख केली. पण दुर्दैवाने, तिचे पती जगभर काम करत असत आणि घरी क्वचितच असत.

मला इथे काम करायला आवडतं, पण मला आणि माझ्या मुलाला ह्यूगोची आठवण येते.

गुडॉल आणि वॅन लॉविक एकमेकांपासून दूर राहिल्यामुळे त्यांच्या नात्यात अंतर पडले. 1974 साली त्यांनी घटस्फोट घेतला. 1975 साली, तिने टांझानिया राष्ट्रीय उद्यानांचे संचालक, *डेरेक ब्रायसेसन* यांच्याशी लग्न केले.

# प्रकरण 4

## कामाची वाटणी

आफ्रिकेत अनेक वर्षे संशोधन केल्यावर, गुडॉलला वाटू लागले की इतर संशोधकांनीही गॉम्बेतील चिंपांझींचा अभ्यास करावा. 1977 साली, तिने *जेन गुडॉल संस्थे*ची स्थापना केली. आज ही संस्था जंगलात राहून चिंपांझींचा अभ्यास करणाऱ्या संशोधकांना पैशाची मदत करते.











गुडॉलने जवळजवळ 45 वर्षे चिंपांझीचा अभ्यास केला. ती आपल्या व्याख्यानांमध्ये चिंपांझींच्या भविष्याबद्दल चिंता व्यक्त करत असे. चिंपांझींची बाळं चोरण्यासाठी त्यांच्या आईला गोळ्या घालणाऱ्या शिकाऱ्यांबद्दल ती बोलत असे.

चिंपांझींची बाळं प्राणीसंग्रहालयांना आणि सर्कशींना विकली जातात. एवढंच नाही, तर काहीजण त्यांना पाळतातसुद्धा.

बहुतेक चिंपांझी मोठे झाल्यावर मजबूत आणि रानटी बनतात. मग त्यांना वैद्यक संशोधन प्रयोगशाळांना विकतात. आपण अशा प्रकारच्या अत्याचारांपासून कायद्याने चिंपांझींचं रक्षण केलं पाहिजे.

आज, चिंपांझी आणि इतर जंगली प्राण्यांना मदत कशी करायची, हे गुडॉल लोकांना शिकवते.

प्रत्येक व्यक्ती महत्त्वाची आहे. प्रत्येक व्यक्तिला एक भूमिका वठवायची असते. प्रत्येक व्यक्ती बदल घडवू शकते. आणि आपल्याकडे एक पर्याय आहे: आपल्याला कशा प्रकारचा बदल घडवून आणायचा आहे?

आपण निसर्गासोबत सुसंवाद साधत जगतोय, असं जग निर्माण करायचं ध्येय आहे माझं. हे मी एकटी करू शकेन का? पण तरुणांचं एक पूर्ण सैन्य हे निश्चितच करू शकेल.



गुडॉलच्या अभूतपूर्व निरीक्षणांनी प्राणी संशोधकांच्या पुढील पिढ्यांचा मार्ग प्रशस्त केला. तिच्या शोधांनी जगाला चिंपांझींविषयी नवी समज दिली. लोकांनी गॉम्बेच्या चिंपांझींचा अभ्यास सुरू ठेवला.

गुडॉल नेहमी शाळाशाळांत जाऊन मुलांना आपण आयुष्यभर केलेल्या चिंपाझींच्या अभ्यासाबद्दल सांगते.

हा माझा जुना मित्र, ज्युबिली.

मी आयुष्यभर तेच केलं जे मला मनापासून आवडत होतं. मी माझं आयुष्य जंगलात मुक्तपणे जगणाऱ्या चिंपांझींसोबत घालवलं. आता जंगल आणि चिंपांझींचं ऋण फेडण्याची माझी पाळी आहे. मला वाटतं की मी माझी निरीक्षणं, शोध याबद्दल लोकांना सांगून हे काम उत्तमपणे करू शकेन.

# जेन गुडॉलबद्दल अधिक माहिती

जेन गुडॉलचे पूर्ण नाव, *वेलेरी जेन मॉरीस-गुडॉल.* तिचा जन्म 3 एप्रिल 1934 रोजी, *मॉर्टीमर* आणि *मार्गारेट मॉरीस गुडॉल* या दांपत्याकडे झाला. तिची बहीण, *ज्यूडी*चा जन्म 1938 साली झाला.

आफ्रिकेत गुडॉलच्या आजुबाजुला मगर, साप आणि बिबळे यांच्यासारखे धोकादायक प्राणी राहात असत.

गुडॉलने नोंद केली की चिंपांझांची कुटुंबे समूह करून राहातात. इतर संशोधक चिंपांझींना क्रमांक देत असत. पण गुडॉलने प्रत्येक चिंपांझीला एक नाव दिले. प्रत्येक कुटुंबाला ती वर्णमालेतील एका अक्षराने संबोधू लागली. उदाहरणार्थ, *फ्लो* आणि *फ्लिंट* एकाच कुटुंबातील होते.

चिंपांझी प्रसंगी हिंसक आणि आक्रमक होऊ शकतात, हे गुडॉलला आढळले होते. काही संशोधकांना वाटत होते की गुडॉलने आपले हे निरीक्षण उघड करू नये. त्यांना चिंता वाटत होती की मानवातील हिंसक प्रवृत्ती ही अनुवंशिकतेने आलेली आहे, हे यातून सिद्ध होईल. पण गुडॉलने आपले निष्कर्ष प्रकाशित करायचा निर्णय घेतला.

जेन गुडॉल संस्थेचे मुख्यालय *मेरीलँड* राज्यातील *सिल्व्हर स्प्रिंग* या ठिकाणी आहे. आज संस्थेची कार्यालये इंग्लंड, चीन आणि जपानसहीत जगभरात आहेत.

गुडॉलला अनेक पुरस्कार मिळाले आहेत. उदाहरणादाखल, *क्योटो पुरस्कार, एनसायक्लोपिडीया ब्रिटानिका पुरस्कार* आणि ॲनिमल वेल्फेअर इंस्टिट्यूटचा *अल्बर्ट श्वाइट्झर पुरस्कार.* टांझानियाचा सर्वोच्च पुरस्कार प्राप्त करणारी ती एकमेव गैर टांझानियन व्यक्ती आहे.

गुडॉलने नॅशनल जिऑग्राफिकसमवेत अनेक मासिकांमध्ये लेख लिहिलेले आहेत. तिने अनेक पुस्तकेदेखील लिहिलेली आहेत – उदाहरणार्थ, *रिसन फॉर होप: अ स्पिरीच्युअल जर्नी अँड द चिंपांझीज ऑफ गॉम्बे: पॅटर्न्स ऑफ बिहेविअर.*

तिने तरुणांसाठीही *चिंपांझी फॅमिली बुक अँड माय लाईफ विथ द चिंपांझीज* सारखी पुस्तके लिहिली.

जेन गुडॉल संस्थेने मुलांसाठी *रुट्स अँड शूट्स* कार्यक्रम सुरू केला आहे. यात विविध साधने वापरून सर्व जीवांची काळजी कशी घ्यायची, हे शिकवणारे उपक्रम असतात. मुले गटागटाने झाडे लावतात, कचरा उचलतात आणि प्राण्यांच्या निवाऱ्याचे रक्षण करतात.

